**विभागीय चौकशी प्रलंबित असलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांना पदोन्नती देताना अवलंबवयाच्या कार्यवाहीबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

**शासन परिपत्रक क्रमांकः एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३१०/का.१२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०८.०३.२०१७

<u>वाचा -</u>

1. **१) शासन परिपत्रक क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग, एसआरव्ही-१०७५/१०, दि.०२.०४.१९७६.**
2. **२) शासन निर्णय क्रमांकः सामान्य प्रशासन विभाग, एसआरव्ही-१०७५/प्र.क्र.२९/ ९५/बारा, दि.२२.४.१९९६**

## <u>शासन परिपत्रक</u>

विभागीय चौकशी प्रलंबित असलेल्या अधिकारी/कर्मचारी यांच्या पदोन्नतीसाठी विचार करताना कोणती कार्यपध्दती वापरावी याबाबतच्या सविस्तर सूचना दि.०२.०४.१९७६ च्या शासन परिपत्रकान्वये दिलेल्या आहेत. तर विभागीय चौकशी प्रलंबित असताना जाणीवपूर्वक निर्णय घेऊन तात्पुरती पदोन्नती देण्यात आलेल्या अधिकारी/कर्मचारी यांना चौकशीनंतरच्या निर्णयानुसार वेतनवाढ/वेतनवाढी रोखण्याची शिक्षा दिल्यास कशा प्रकारे कार्यवाही करावी याबाबतच्या सूचना दि.२२.०४.१९९६ च्या शासन निर्णयान्वये दिलेल्या आहेत.

२. दि.०२.०४.१९७६ व दि.२२.०४.१९९६ मधील तरतूदी विचारात घेऊन प्रशासकीय विभाग किंवा सक्षम प्राधिकारी, विभागीय चौकशी सुरु असलेल्या शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्याची पदोन्नतीसाठी जाणीवपूर्वक निर्णय घेत असतात. मात्र असे निर्णय घेतल्यानंतर विभागीय चौकशी अंती दिलेल्या तात्पुरत्या पदोन्नत्या नियमित करणे किंवा संबंधित अधिकाऱ्याच्या/कर्मचाऱ्याच्या पदोन्नतीचे पुनर्विलोकन करणे आवश्यक असते. तथापि सक्षम प्राधिकाऱ्याकडून अशी कार्यवाही केल्याचे प्रकरण अढळून येत नाही. या खेरीज श्री.जानकीरामन विरुध्द केंद्र शासन प्रकरणात मा. सर्वोच्च न्यायालयाने विभागीय चौकशी सुरु असलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या बाबतीत कशा प्रकारे कार्यवाही करावी याबाबत निर्देश दिलेले आहेत.

३. केंद्र शासनाने देखील, केंद्र शासकीय कर्मचाऱ्यांसंदर्भात ज्यांच्याविरुध्द शिस्तभंगविषयक वा न्यायालयीन कार्यवाही प्रलंबित आहे त्यांच्याबाबतीत कशाप्रकारे पदोन्नतीची कार्यवाही करावी याबाबत वेळोवेळी आदेश निर्गमित केले आहेत. मा.सर्वोच्च न्यायालयाचे आदेश व केंद्र शासनाचे आदेश विचारात घेऊन या विभागाच्या दि.०२.०४.१९७६ च्या शासन परिपत्रकात व दि.२२.४.१९९६ च्या शासन निर्णयामधील तरतूदी रद्द करुन सुधारीत तरतूदी लागू करण्याचे शासनाच्या विचाराधीन आहे. या अनुषंगाने दि.०२.०४.१९७६ च्या शासन परिपत्रकात व दि.२२.०४.१९९६ च्या शासन निर्णयातील आदेश रद्द करुन प्रस्तावित सुधारीत कार्यपध्दती सोबतच्या परिशिष्टात नमूद केली आहे.

४. सुधारित कार्यपध्दती लागू करण्यापूर्वी या कार्यपध्दतीसंदर्भात अधिकारी/कर्मचाऱ्यांना वा त्यांच्या संघटनांना काही सुधारणा सुचवायच्या असल्यास, या सुधारणा मा.अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग यांच्याकडे थेट निवेदनाद्वारे वा ई-मेल desk12.gad@maharashtra.gov.in वर, हे शासन परिपत्रक निर्गमित झाल्यापासून १ महिन्याच्या आत खालील नमुन्यात सादर कराव्यात. तद्नंतर आलेल्या सुचनांचा विचार केला जाणार नाही.

| प्रारुप आदेशातील अनुक्रमांक व परिच्छेद | सुधारणा | सुधारणेसाठी समर्थन/न्याय निर्णय/ Case Laws |
|---|---|---|
| | | |

स्वाक्षरी
(नाव,पदनाम,कार्यालय)

५. सदर शासन परिपत्रकातील सूचना सर्व विभाग /कार्यालय प्रमुखांनी त्यांच्या अधिपत्याखालील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या निदर्शनास आणाव्यात.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०८१२०३३१३६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2017.03.08 12:04:46 +05'30'

**(सु.ह.उमराणीकर)**
**उप सचिव (सेवा), महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, विधानभवन, मुंबई,
५. सर्व मा.संसद सदस्य, /मा. विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य,
६. मा. मुख्य सचिव,
७. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
८. सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना),
-त्यांनी हे आदेश सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणावे.
९. *प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
१०.*प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
११.* प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
१२.*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१३.*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा) मुंबई,
१४.*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान परिषद) मुंबई,
१५.*राज्य निवडणूक आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई,
१६.*सचिव, राज्य माहिती आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई,
१७.*महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई.
१८. *महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई,
१९.*महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर,
२०.*महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, नागपूर,
२१.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मुंबई (प्रसिध्दीकरिता ५ प्रती)

२२.ग्रंथपाल , महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, सहावा मजला, विधान भवन, मुंबई ४०० ०३२ (१० प्रती)

२३.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

२४.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

२५.मुख्य लेखापरीक्षक (निवासी लेखे), कोंकण भवन, नवी मुंबई,

२६.सर्व विभागीय आयुक्त

२७.सर्व जिल्हाधिकारी

२८. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,

२९.सर्व मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख,

३०.*सर्व अधिकारी/कर्मचाऱ्यांची मान्यता प्राप्त संघटना, (कार्यासन -१६ अ, सामान्य प्रशासन विभागामार्फत)

३१.सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,

३२.निवड नस्ती.

(*-पत्राद्वारे)

## शासन परिपत्रक क्रमांकः एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३१०/का.१२ दि.०८.०३.२०१७ च्या सोबतचे परिशिष्ट

## विभागीय चौकशी/न्यायालयीन कार्यवाही सुरु असलेल्या राज्य शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना पदोन्नती देताना अवलंबवयाची कार्यपध्दती (प्रस्तावित)

१. राज्य शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांना पदोन्नती देताना शिस्तभंगविषयक अथवा न्यायालयीन कार्यवाही सुरू असलेल्या कर्मचाऱ्यासंदर्भात समान कार्यपध्दती अवलंबिली जावी या दृष्टीने व केंद्र शासनाच्या कर्मचाऱ्यासाठी केंद्र शासनाने विहित केलेल्या कार्यपध्दतीशी सुसंगत अशी कार्यपध्दती ठेवण्याच्या दृष्टीने या विभागाच्या दि.२.४.७६ व दि.२२.४.९६ च्या शासन परिपत्रक व शासन निर्णय रद्द करुन खालील कार्यपध्दती विहीत करण्यात येत आहेत.

१) विभागीय पदोन्नती समितीच्या बैठकीच्या दिनांकाला

*अ) जे अधिकारी /कर्मचारी निलंबीत आहेत,*

*ब) ज्या अधिकारी/कर्मचाऱ्याच्याविरुध्द शिस्तभंग विषयक कार्यवाहीच्या अनुषंगाने दोषारोप बजाविलेले आहेत व शिस्तभंग विषयक कार्यवाही सुरु झालेली आहे,*

*क) ज्या अधिकारी/कर्मचाऱ्याच्याविरुध्द फौजदारी आरोपाचे न्यायालयीन प्रकरण प्रलंबित आहे,*

*फौजदारी आरोपाचे न्यायालयीन प्रकरण प्रलंबित असल्याचे केव्हा समजण्यात येईल या साठी* म.ना.से. (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ मधील नियम २७(६)(बी)(एक) मध्ये दिलेला खालील अर्थ विचारात घेण्यात येईल :-

*(बी) न्यायिक कार्यवाही -*

*(एक) फौजदारी कार्यवाहीच्या बाबतीत, दंडाधिकारी जिची दखल घेतो अशी तक्रार किंवा प्रतिवेदन पोलीस अधिकाऱ्याने ज्या तारखेस दाखल केले असेल त्या तारखेस सुरू केली असल्याचे मानण्यात येईल.*

अशा अधिकारी /कर्मचाऱ्यांच्या पदोन्नतीच्या प्रकरणात विभागीय पदोन्नती समिती त्यांची गोपनीय अभिलेखाच्या व इतर सेवाप्रवेश नियमाच्या तरतुदींच्या अनुषंगाने पात्रता तपासेल. मात्र संबंधीत अधिकारी/कर्मचाऱ्यांसंदर्भात विभागीय पदोन्नती समितीने केलेले मूल्यमापन (Assessment) आणि दिलेली प्रतवारी स्वतंत्र पाकीटात

मोहोरबंद करुन ठेवण्यात येईल या पाकीटावर "श्री ———————————————————————————————————".

(सरकारी कर्मचाऱ्याचे नाव) यांच्याबाबतीत या पदावरुन (निम्न पदाचे सध्याच्या पदाचे नाव) या पदावर (पदोन्नतीच्या पदाचे नाव) पदोन्नती देण्याकरिता आवश्यक योग्यतेबाबतचे निष्कर्ष श्री. ——————— ——————————— ———————————यांच्याविरुध्दच्या शिस्तभंगाच्या प्रकरणाची/फौजदारी खटल्याची समाप्ती होईपर्यंत हे पाकीट उघडण्यात येवू नये" असा मायना लिहीण्यात यावा.

२) विभागीय पदोन्नती समितीच्या इतिवृत्तामध्ये संबंधीत अधिकारी/कर्मचाऱ्याच्या नावासमोर पात्र/अपात्र न लिहीता निष्कर्ष "**सोबतच्या मोहोरबंद पाकीटात**" असा शेरा/अभिप्राय नमूद करावे.

३) संबंधित अधिकारी/कर्मचाऱ्याच्या पदोन्नतीचे प्रकरण मोहोरबंद पाकीटात ठेवल्यामुळे संबंधित अधिकारी/कर्मचाऱ्याच्याऐवजी जेष्ठतेनुसार पात्र ठरणाऱ्या अन्य अधिकारी/कर्मचाऱ्याचा निवडसूचीत समावेश करण्याबाबत विचार करावा.

४) विभागीय चौकशीची कार्यवाहीस खूप विलंब लागू नये यासाठी विभागीय पदोन्नती समितीच्या बैठकीच्या दिनांकानंतर सहा महिन्यांनी नियुक्ती प्राधिकारी यांनी मोहोरबंद पाकीटात ठेवलेल्या पदोन्नती प्रकरणाचे पुनर्विलोकन करावे. या अनुषंगाने संबंधीत अधिकारी/कर्मचाऱ्याचे शिस्तभंगविषयक/न्यायालयीन कार्यवाहीची सद्य:स्थिती व सदरहू कार्यवाही केव्हापर्यंत संपूष्टात येईल व ती संपूष्टात आणण्यासाठी नियुक्ती प्राधिकारी आवश्यक ती उपाययोजना निश्चित करेल.

५) विभागीय पदोन्नती समितीच्या बैठकीच्या दिनांकाला जरी एखादा अधिकारी/कर्मचारी निलंबीत नसेल अथवा त्याच्याविरुध्द शिस्तभंगविषयक/न्यायालयीन कार्यवाही सुरु झाली नसेल मात्र संबंधीत अधिकारी/कर्मचाऱ्याचे प्रत्यक्ष पदोन्नतीचे आदेश निर्गमीत होण्यापूर्वी संबंधीत अधिकारी/कर्मचारी निलंबीत झाल्यास वा त्याच्याविरुध्द शिस्तभंगविषयक/ न्यायालयीन कार्यवाही सुरु झाल्यास नियुक्ती प्राधिकारी संबंधीत अधिकारी/कर्मचाऱ्याचे पदोन्नतीचे प्रकरण उपपरिच्छेद (१) मधील सूचनेनुसार मोहोरबंद पाकीटात ठेवेल.

६) विभागीय पदोन्नती समितीच्या बैठकीच्या दिनांकाच्या ६ महिन्यांनंतर मोहोरबंद पाकीटात ठेवलेले प्रकरण नियुक्ती प्राधिकारी यांनी

पुनर्विलोकित करावे. पुनर्विलोकनावेळी निलंबीत अधिकाऱ्यास पुनःस्थापीत केले असल्याचे व त्यांचेविरुध्द कोणतीही शिस्तभंगविषयक कार्यवाही सुरू झालेली नसल्याचे आढळून आल्यास मोहोरबंद लिफाफा उघडून त्यातील निष्कर्षानुसार तो पदोन्नतीस पात्र असल्यास त्यास पदोन्नती देण्यात यावी. तसेच ज्या अधिकारी/कर्मचाऱ्याविरुध्दची शिस्तभंगविषयक कार्यवाही संपूष्टात येवून शिक्षा दिली असल्यास अशा अधिकारी/कर्मचाऱ्यांचे सीलबंद लिफाफे न उघडता त्यांची पदोन्नतीसाठीची पात्रता पुढील नियमित विभागीय पदोन्नती समितीच्या बैठकीमध्ये तपासण्यात यावी.

७) सहा महिन्याच्या पुनर्विलोकनावेळी ज्या प्रकरणात शिस्तभंगाविषयक/ न्यायालयीन कार्यवाही पूर्ण झालेली नसेल अशा प्रकरणात मोहोरबंद पाकीट उघडून निर्णय घेण्यात येवू नये.

८) विभागीय पदोन्नती समितीच्या पहिल्या बैठकीत मोहोरबंद पाकीटात निष्कर्ष ठेवण्यात आलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्याची दुसऱ्या व त्यापुढील विभागीय पदोन्नती समितीच्या नियमित बैठकीत पुन्हा पात्रता तपासण्याची आवश्यकता नाही. मात्र अशा प्रकरणांचे दुसरे पुनर्विलोकन पुढील वर्षी होणाऱ्या विभागीय पदोन्नती समितीच्या नियमित बैठकीत करण्यात यावे. विभागीय पदोन्नती समितीची नियमित बैठक होणार नसल्यास पुनर्विलोकनासाठी विभागीय पदोन्नती समितीची बैठक घ्यावी. सदर विभागीय पदोन्नती समितीच्या बैठकीत मोहोरबंद पाकीटात निष्कर्ष ठेवण्यात आलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या शिस्तभंगविषयक/ न्यायालयीन कार्यवाहीचा आढावा घेण्यात यावा.

९) विभागीय पदोन्नती समितीच्या मुळ बैठकीच्या दिनांकापासून दोन वर्षे झाल्यानंतरही मोहोरबंद पाकीटात निष्कर्ष ठेवलेल्या अधिकारी/ कर्मचाऱ्याच्या शिस्तभंगविषयक /न्यायालयीन कार्यवाही प्रकरणी अंतिम निर्णय झालेला नसल्यास, अशा प्रकरणी नियुक्ती प्राधिकारी स्वविवेकानुसार संबंधीत अधिकारी/कर्मचाऱ्याला तदर्थ पदोन्नती देण्याबाबत जाणीवपूर्वक निर्णय घेईल. असा निर्णय घेताना नियुक्ती प्राधिकारी, खालील मुद्दे विचारात घेईल.

अ) संबंधितांविरुध्दची शिस्तभंगविषयक/न्यायालयीन कार्यवाही बराच काळ प्रलंबित राहण्याची शक्यता,

ब) दोषारोपांचे गांभीर्य,

क) द्यावयाची पदोन्नती जनहिताच्या विरुध्द जाईल का,

ड) शिस्तभंगविषयक/न्यायालयीन कार्यवाही लांबण्यास संबंधीत अधिकारी /कर्मचारी जबाबदार आहे का?

ई) संबंधित अधिकारी/कर्मचाऱ्यास तदर्थ पदोन्नती दिल्यानंतर, पदोन्नतीच्या पदावर काम केल्यामुळे, संबंधित अधिकारी/ कर्मचाऱ्याच्या शिस्तभंगविषयक /न्यायालयीन कार्यवाहीच्या प्रकरणांवर परिणाम होण्याची शक्यता आहे का? किंवा संबंधीत अधिकारी/कर्मचारी पदोन्नतीच्या पदाचा त्यासाठी दुरुपयोग करण्याची शक्यता आहे का?

फ) न्यायालयीन कार्यवाही बाबतची सद्यस्थिती / अभियोगाबाबतचे किती टप्पे पार पडले याबाबतची माहिती करुन घ्यावी.

ग) सेवानिवृत्तीस १ वर्ष शिल्लक असेल तर पदोन्नती न देण्याच्या अनुषंगाने सेवानिवृत्तीचा कालावधी विचारात घेणे (तदर्थ पदोन्नती दिल्यास वरिष्ठ वेतनश्रेणी प्राप्त झाल्यामुळे सेवानिवृत्तीनंतर मिळणारे सेवानिवृत्ती वेतनाचा ज्यादा लाभ प्राप्त होणार असल्यामुळे सेवानिवृत्तीस एक वर्ष शिल्लक असलेल्यांना तदर्थ पदोन्नती देण्यात येऊ नये याकरीता ही बाब तपासणे आवश्यक आहे.)

१०) एकाच शिस्तभंगविषयक कार्यवाहीत गट अ, ब आणि क या निरनिराळ्या गटातील अधिकारी व कर्मचारी गुंतलेले असल्यास अशा शिस्तभंगविषयक प्रकरणात जो सर्वोच्च अधिकारी असेल त्यांना तदर्थ पदोन्नती देण्यास सक्षम प्राधिकारी असेल तोच प्राधिकारी अशा प्रकरणातील इतर कर्मचाऱ्यांच्या बाबतीतही निर्णय घेण्यास सक्षम प्राधिकारी असेल.

११) विभागीय पदोन्नती समितीच्या पहिल्या बैठकीनंतर दोन वर्षांनी शिस्तभंगविषयक/न्यायालयीन कार्यवाहीच्या अंतिम निर्णयाच्या अधिन संबंधित अधिकारी/कर्मचाऱ्यास तदर्थ पदोन्नती देणे आवश्यक आहे असे सक्षम प्राधिकाऱ्याचे मत झाल्यास मोहोरबंद पाकिट उघडण्यात येवू नये. विभागीय पदोन्नती समितीची बैठक बोलावून संबंधित अधिकारी /कर्मचाऱ्याची पात्रता/अपात्रता नव्याने तपासावी. पुन्हा नव्याने पात्रता तपासल्यानंतर संबंधीत अधिकारी/कर्मचारी पदोन्नतीसाठी पात्र ठरल्यास त्यांना ११ महिन्यासाठी किंवा विभागीय चौकशी/न्यायालयीन कार्यवाही अंतिम होईल यापैकी जे अगोदर होईल तेवढ्या कालावधीसाठी खालील अटींच्या अधीन राहून निव्वळ तदर्थ पदोन्नती देण्यात यावी. खालील अटी व शर्ती तदर्थ पदोन्नतीच्या आदेशामध्ये सुस्पष्टपणे नमूद कराव्यात :

i) शिस्तभंगविषयक/न्यायालयीन कार्यवाहीच्या अधिन दिली जाणारी तदर्थ पदोन्नती केवळ तात्पुरती असेल व या तदर्थ पदोन्नतीमुळे

नियमितपणाचे व ज्येष्ठतेचे कोणतेही लाभ अशा अधिकारी/ कर्मचाऱ्यांना मिळणार नाहीत

ii) ही तदर्थ पदोन्नती "पुढील आदेशापर्यंत असेल". तसेच कोणत्याही वेळी दिलेली तदर्थ पदोन्नती रद्द करुन मूळ पदावर पदावनत करण्याचा हक्क शासन राखून ठेवीत आहे .

iii) सेवानिवृत्तीस १ वर्ष शिल्लक असल्यास दिलेली तदर्थ पदोन्नती रद्द करण्यात येईल. (सदरहू अट विहीत करण्यामागची कारणमिमांसा उप परि. ९(ग) मध्ये नमूद केलेली आहे.)

१२) **शिस्तभंगविषयक/न्यायालयीन कार्यवाही चालू असलेल्या प्रकरणी संबंधित अधिकारी/कर्मचारी दोषमुक्त ठरल्यास किंवा फौजदारी खटल्यात निर्दोष सुटल्यास, खालीलप्रमाणे कार्यवाही करावी :-**

अ) तदर्थ पदोन्नती दिलेली नसल्यास त्याचे मोहोरबंद पाकीट उघडून त्यातील निष्कर्षानुसार तो पदोन्नतीसाठी पात्र ठरत असल्यास त्याला नियमीत पदोन्नती द्यावी.

ब) अधिकारी/कर्मचाऱ्यास तदर्थ पदोन्नती दिलेली असल्यास, दिलेली तदर्थ पदोन्नती नियमीत करण्यात यावी.

क) मोहोरबंद पाकीटातील शिफारशीनुसार तो पदोन्नतीसाठी पात्र असल्यास संबंधीत अधिकारी/कर्मचाऱ्यास, कनिष्ठ असलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्याला ज्या निवडसूचीत स्थान देण्यात येवून नियमीत पदोन्नती देण्यात आली असेल, अशा कनिष्ठ अधिकारी/कर्मचाऱ्याच्या पदोन्नतीचा दिनांक हा त्यांना पदोन्नतीचा मानीव दिनांक देण्यात यावा.

१३) **शिस्तभंगविषयक/न्यायालयीन कार्यवाही चालू असलेल्या प्रकरणी एखाद्या अधिकारी/कर्मचाऱ्यास तदर्थ पदोन्नती दिली असेल, मात्र शिस्तभंगविषयक कार्यवाहीमध्ये संबंधीत अधिकारी/कर्मचारी दोषी ठरवून त्याला शिक्षा लादल्यास खालीलप्रमाणे कार्यवाही करावी -**

अ) ठपका ठेवण्याची शिक्षा दिल्यास, दिलेली तदर्थ पदोन्नती संपुष्टात आणावी व मोहोरबंद पाकीट न उघडता त्यांच्या पदोन्नतीचा प्रस्ताव विभागीय पदोन्नती समितीच्या पुढील नियमित बैठकीमध्ये ठेवावा व पदोन्नतीसाठी त्यांची पात्रता इतर कर्मचाऱ्यासोबत पुन्हा तपासावी. संबंधित अधिकारी/कर्मचारी पदोन्नतीसाठी पात्र ठरल्यास त्यांना पदोन्नती देण्यात यावी.

ब) एक किंवा अधिक वर्षे वेतनवाढ रोखण्याची किंवा विनिर्दिष्ट कालावधीसाठी वेतनश्रेणीतील वेतन खालच्या टप्प्यावर आणण्याची शिक्षा झाल्यास तदर्थ पदोन्नती संपुष्टात आणावी. एखाद्या प्रकरणात अधिकारी/कर्मचाऱ्यांना दिलेल्या शिक्षेचा अंमल त्या निवडसूची वर्षाच्या

कालावधीतच संपणार असल्यास व शिक्षेचा कालावधी संपुष्टात येण्याच्या आधीच विभागीय पदोन्नती समितीची बैठक होणार असल्यास त्या बैठकीत संबंधीत अधिकारी/कर्मचाऱ्याचा पदोन्नतीसाठी विचार करावा व गोपनीय अहवालाच्या आधारे असे अधिकारी पात्र ठरत असल्यास त्यांना शिक्षेचा कालावधी संपल्यानंतर पदोन्नती देण्यात यावी. मात्र अन्य प्रकरणात अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या शिक्षेचा कालावधी संपल्यानंतर विभागीय पदोन्नती समितीच्या पुढील नियमित बैठकीमध्ये अशा अधिकाऱ्यांच्या पदोन्नतीचा प्रस्ताव इतर अधिकारी/ कर्मचाऱ्यांसोबत विचारार्थ ठेवावा व ते पदोन्नतीस पात्र ठरत असल्यास त्यांना पदोन्नती देण्यात यावी.

क) पदोन्नती रोखण्याची शिक्षा झाल्यास तदर्थ पदोन्नती संपूष्टात आणावी. एखाद्या प्रकरणात अधिकारी/कर्मचाऱ्यांना दिलेल्या शिक्षेचा अंमल त्या निवडसूची वर्षाच्या कालावधीतच संपणार असल्यास व शिक्षेचा कालावधी संपुष्टात येण्याच्या आधीच विभागीय पदोन्नती समितीची बैठक होणार असल्यास त्या बैठकीत संबंधीत अधिकारी/कर्मचाऱ्याचा पदोन्नतीसाठी विचार करावा व गोपनीय अहवालाच्या आधारे असे अधिकारी पात्र ठरत असल्यास त्यांना शिक्षेचा कालावधी संपल्यानंतर पदोन्नती देण्यात यावी. मात्र अन्य प्रकरणात अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या शिक्षेचा कालावधी संपल्यानंतर विभागीय पदोन्नती समितीच्या पुढील नियमित बैठकीमध्ये अशा अधिकाऱ्यांच्या पदोन्नतीचा प्रस्ताव इतर अधिकारी/कर्मचाऱ्यांसोबत विचारार्थ ठेवावा व ते पदोन्नतीस पात्र ठरत असल्यास त्यांना पदोन्नती देण्यात यावी.

ड) एखाद्या अधिकारी/कर्मचाऱ्यास विनिर्दिष्ट कालावधीसाठी तो ज्या वेतन समयश्रेणीमध्ये, श्रेणीमध्ये,पदांवर किंवा सेवेमध्ये असेल त्यापेक्षा खालच्या वेतन समयश्रेणीमध्ये, श्रेणीमध्ये, पदावर किंवा सेवेमध्ये आणण्याची शिक्षा झाल्यास अशा प्रकरणात दिलेली तदर्थ पदोन्नती रद्द करुन, तो ज्या वेतन समयश्रेणीमध्ये, श्रेणीमध्ये,पदांवर किंवा सेवेमध्ये असताना शिस्तभंगविषयक कार्यवाही चालू होती त्या वेतनसमयश्रेणीतून, श्रेणीमधून, पदावरून किंवा सेवेतून अधिकारी/ कर्मचाऱ्यास खालच्या वेतन समयश्रेणीमध्ये, श्रेणीमध्ये, पदावर किंवा सेवेमध्ये अवनत करण्यासंदर्भात शिस्तभंगविषयक कार्यवाही करावी. सदरहू शास्ती/ शिक्षेनुसार संबंधीत अधिकारी/ कर्मचाऱ्याची सेवाज्येष्ठता अधिकारी/ कर्मचाऱ्याच्या शिक्षेच्या/ शास्तीच्या आदेशामध्ये नमूद केल्यानुसार निश्चित करण्यात यावी. शिक्षेचा कालावधी संपल्यानंतर त्याच्या मूळ वेतन समयश्रेणीमध्ये, श्रेणीमध्ये,

पदावर किंवा सेवेमध्ये परत आणल्यानंतर त्याची मूळ सेवाज्येष्ठता कशी राहील हे विचारात घ्यावी. सुधारीत सेवाज्येष्ठतेनुसार पदोन्नतीच्या विचारक्षेत्रात येत नसल्यास विभागीय पदोन्नती समितीच्या बैठकीमध्ये त्याचा पदोन्नतीच्या पदाकरीता विचार करण्यात येवू नये. मात्र तो सुधारीत सेवाज्येष्ठतेनुसार पदोन्नतीच्या विचारक्षेत्रात येत असल्यास विभागीय पदोन्नती समितीच्या बैठकीमध्ये त्याचा पदोन्नतीच्या पदाकरीता विचार करण्यात यावा व तो पदोन्नतीस पात्र ठरत असल्यास त्याला पदोन्नती देण्यात यावी.

ई) ज्या प्रकरणात संबंधीत अधिकारी/कर्मचाऱ्यास सक्तीने सेवानिवृत्ती, सेवेतून काढून टाकणे किंवा बडतर्फी या शिक्षांपैकी कोणतीही एक शिक्षा झाली असेल, तर त्यांची तदर्थ पदोन्नती संपूष्टात आणावी व शिस्तभंगविषयक कार्यवाही ज्या पदावर चालू होती त्या पदानुसार जबर शिक्षेची अंमलबजावणी सुरु करावी.

१४) **शिस्तभंगविषयक कार्यवाही/न्यायालयीन कार्यवाही सुरु असताना अधिकारी/कर्मचाऱ्याला तदर्थ पदोन्नती न देताच त्याच्यावरील शिस्तभंगविषयक कार्यवाहीच्या अनुषंगाने तो दोषी ठरत असल्यास व त्याच्यावर शिक्षा/शास्ती लादल्यास त्याच्याबाबतीत खालीलप्रमाणे कार्यवाही करावी-**

अ) शिस्तभंगविषयक कार्यवाहीमध्ये ठपका ठेवण्याची शिक्षा झाल्यास, मोहोरबंद पाकीट न उघडता त्यांच्या पदोन्नतीचा प्रस्ताव विभागीय पदोन्नती समितीच्या पुढील नियमित बैठकीमध्ये ठेवावा व पदोन्नतीसाठी त्यांची पात्रता इतर कर्मचाऱ्यासोबत पुन्हा तपासावी. संबंधित अधिकारी/कर्मचारी पदोन्नतीसाठी पात्र ठरल्यास त्यांना पदोन्नती देण्यात यावी.

ब) एक किंवा अधिक वर्षे वेतनवाढ रोखण्याची किंवा विनिर्दिष्ट कालावधीसाठी वेतनश्रेणीतील वेतन खालच्या टप्प्यावर आणण्याची शिक्षा झाल्यास एखाद्या प्रकरणात अधिकारी/कर्मचाऱ्यांना दिलेल्या शिक्षेचा अंमल त्या निवडसूची वर्षाच्या कालावधीतच संपणार असल्यास व शिक्षेचा कालावधी संपुष्टात येण्याच्या आधीच विभागीय पदोन्नती समितीची बैठक होणार असल्यास त्या बैठकीत संबंधीत अधिकारी/कर्मचाऱ्याचा पदोन्नतीसाठी विचार करावा व गोपनीय अहवालाच्या आधारे असे अधिकारी पात्र ठरत असल्यास त्यांना शिक्षेचा कालावधी संपल्यानंतर पदोन्नती देण्यात यावी. मात्र अन्य प्रकरणात अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या शिक्षेचा कालावधी संपल्यानंतर विभागीय पदोन्नती समितीच्या पुढील नियमित बैठकीमध्ये अशा अधिकाऱ्यांच्या

पदोन्नतीचा प्रस्ताव इतर अधिकारी/कर्मचाऱ्यांसोबत विचारार्थ ठेवावा व ते पदोन्नतीस पात्र ठरत असल्यास त्यांना पदोन्नती देण्यात यावी.

क) पदोन्नती रोखण्याची शिक्षा झाल्यास एखाद्या प्रकरणात अधिकारी/कर्मचाऱ्यांना दिलेल्या शिक्षेचा अंमल त्या निवडसूची वर्षाच्या कालावधीतच संपणार असल्यास व शिक्षेचा कालावधी संपुष्टात येण्याच्या आधीच विभागीय पदोन्नती समितीची बैठक होणार असल्यास त्या बैठकीत संबंधीत अधिकारी/कर्मचाऱ्याचा पदोन्नतीसाठी विचार करावा व गोपनीय अहवालाच्या आधारे असे अधिकारी पात्र ठरत असल्यास त्यांना शिक्षेचा कालावधी संपल्यानंतर पदोन्नती देण्यात यावी. मात्र अन्य प्रकरणात अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या शिक्षेचा कालावधी संपल्यानंतर विभागीय पदोन्नती समितीच्या पुढील नियमित बैठकीमध्ये अशा अधिकाऱ्यांच्या पदोन्नतीचा प्रस्ताव इतर अधिकारी /कर्मचाऱ्यांसोबत विचारार्थ ठेवावा व ते पदोन्नतीस पात्र ठरत असल्यास त्यांना पदोन्नती देण्यात यावी.

ड) एखाद्या अधिकारी/कर्मचाऱ्यास विनिर्दिष्ट कालावधीसाठी तो ज्या वेतन समयश्रेणीमध्ये, श्रेणीमध्ये,पदांवर किंवा सेवेमध्ये असेल त्यापेक्षा खालच्या वेतन समयश्रेणीमध्ये, श्रेणीमध्ये, पदावर किंवा सेवेमध्ये आणण्याची शिक्षा झाल्यास अशा प्रकरणात, तो ज्या वेतन समयश्रेणीमध्ये, श्रेणीमध्ये,पदांवर किंवा सेवेमध्ये असताना शिस्तभंगविषयक कार्यवाही चालू होती त्या वेतनसमयश्रेणीतून, श्रेणीमधून, पदावरून किंवा सेवेतून अधिकारी/ कर्मचाऱ्यास खालच्या वेतन समयश्रेणीमध्ये, श्रेणीमध्ये, पदावर किंवा सेवेमध्ये अवनत करण्यासंदर्भात शिस्तभंगविषयक कार्यवाही करावी. सदरहू शास्ती/ शिक्षेनुसार संबंधीत अधिकारी/ कर्मचाऱ्याची सेवाज्येष्ठता अधिकारी/ कर्मचाऱ्याच्या शिक्षेच्या/ शास्तीच्या आदेशामध्ये नमूद केल्यानुसार निश्चित करण्यात यावी. शिक्षेचा कालावधी संपल्यानंतर त्याच्या मूळ वेतन समयश्रेणीमध्ये, श्रेणीमध्ये, पदावर किंवा सेवेमध्ये परत आणल्यानंतर त्याची मूळ सेवाज्येष्ठता कशी राहील हे विचारात घ्यावी. सुधारीत सेवाज्येष्ठतेनुसार पदोन्नतीच्या विचारक्षेत्रात येत नसल्यास विभागीय पदोन्नती समितीच्या बैठकीमध्ये त्याचा पदोन्नतीच्या पदाकरीता विचार करण्यात येवू नये. मात्र तो सुधारीत सेवाज्येष्ठतेनुसार पदोन्नतीच्या विचारक्षेत्रात येत असल्यास विभागीय पदोन्नती समितीच्या बैठकीमध्ये त्याचा पदोन्नतीच्या पदाकरीता विचार करण्यात यावा व तो पदोन्नतीस पात्र ठरत असल्यास त्याला पदोन्नती देण्यात यावी.

ई) ज्या प्रकरणात संबंधीत अधिकारी/कर्मचाऱ्यास सक्तीने सेवानिवृत्ती, सेवेतून काढून टाकणे किंवा बडतर्फी या शिक्षांपैकी कोणतीही एक शिक्षा झाल्यास त्यावरील अपिलाची वाट न पाहता, शिस्तभंगविषयक कार्यवाही ज्या पदावर चालू होती त्या पदानुसार जबर शिक्षेची अंमलबजावणी सुरु करावी.

१५) न्यायालयीन कार्यवाही चालू असताना एखाद्या अधिकारी/कर्मचाऱ्यास जाणीवपूर्वक निर्णय घेवून तदर्थ पदोन्नती दिलेली असल्यास व न्यायालयीन कार्यवाहीमध्ये न्यायालयाने शिक्षा ठोठावल्यास संबंधीत अधिकारी/ कर्मचाऱ्याची तदर्थ पदोन्नती तात्काळ संपूष्टात आणावी व न्यायालयाच्या निर्णयानुसार शिक्षेची अंमलबजावणी सुरु करावी. प्रस्तुत प्रकरणात संबंधीत कर्मचाऱ्याने कनिष्ठ न्यायालयाच्या निर्णयाच्या विरोधात वरिष्ठ न्यायालयात जरी अपिल केले वा अपिलात वरिष्ठ न्यायालयाने कनिष्ठ न्यायालयाच्या निर्णयाला स्थगिती आदेश दिले तरी अशा कर्मचाऱ्यांची तदर्थ पदोन्नती चालू ठेवण्यात येवू नये.

१६) न्यायालयीन कार्यवाही चालू असलेल्या प्रकरणात एखाद्या अधिकारी/कर्मचाऱ्यास तदर्थ पदोन्नती दिलेली नसल्यास व न्यायालयीन कार्यवाहीमध्ये संबंधीत अधिकारी/कर्मचारी दोषी ठरल्यास व न्यायालयाने त्यांना शिक्षा ठोठावल्यास संबंधीत अधिकारी/कर्मचाऱ्यास मोहोरबंद पाकीट उघडून पदोन्नती देण्याचा प्रश्न उद्भवत नाही. न्यायालयाने दिलेल्या शिक्षेची अंमलबजावणी करण्याची कार्यवाही सुरू करावी. प्रस्तुत प्रकरणात संबंधीत अधिकारी/कर्मचाऱ्याने कनिष्ठ न्यायालयाच्या निर्णयाच्या विरोधात वरिष्ठ न्यायालयात जरी अपील दाखल केले व अपिलात वरिष्ठ न्यायालयाने कनिष्ठ न्यायालयाच्या निर्णयाला स्थगिती आदेश दिले तरी संबंधीत अधिकारी/कर्मचाऱ्याला मोहोरबंद पाकीट उघडून पदोन्नती देवू नये.

१७) अ) न्यायालयीन कार्यवाही सुरु असलेल्या प्रकरणात एखादा अधिकारी/कर्मचाऱ्यास सबळ पुराव्याअभावी किंवा तांत्रिक मुद्यावर निर्दोष ठरविल्यास व कनिष्ठ न्यायालयाच्या निर्णयाच्या विरोधात वरिष्ठ न्यायालयात अपिल दाखल केल्यानंतर वरिष्ठ न्यायालयाने कनिष्ठ न्यायालयाच्या निर्णयाला स्थगिती दिल्यास,

१. तदर्थ पदोन्नती दिली असल्यास ती चालू ठेवावी, मात्र ती तदर्थ पदोन्नती वरिष्ठ न्यायालयाचा अंतिम निर्णय होईपर्यंत नियमीत करण्यात येवू नये.

२. मात्र तदर्थ पदोन्नती दिली नसल्यास मोहोरबंद पाकीट उघडून त्याला तदर्थ पदोन्नती देण्यात येवू नये.

ब) न्यायालयीन कार्यवाही सुरु असलेल्या प्रकरणात एखादा अधिकारी/कर्मचारी सबळ पुराव्याअभावी किंवा तांत्रिक मुद्यावर निर्दोष ठरल्यास व वरिष्ठ न्यायालयातील अपिलामध्ये कनिष्ठ न्यायालयाचा निर्णय फिरवून संबंधीत अधिकारी/कर्मचाऱ्यास दोषी ठरविल्यास यापूर्वीच्या उप परिच्छेद १५ व १६ नुसार कार्यवाही करावी.

क) न्यायालयीन कार्यवाही सुरु असलेल्या प्रकरणात एखादा अधिकारी/कर्मचारी सबळ पुराव्याअभावी किंवा तांत्रिक मुद्यावर निर्दोष ठरल्यास व सदर निर्णयाविरोधात वरिष्ठ न्यायालयात अपिल दाखल न करण्याचा निर्णय विभागाने घेतल्यास किंवा वरिष्ठ न्यायालयात केलेल्या अपिलामध्ये वरिष्ठ न्यायालयाने कनिष्ठ न्यायालयाचा निर्णय कायम ठेवल्यास उपपरिच्छेद क्रमांक १२ नुसार कार्यवाही करावी.

१८) ज्या अधिकारी/कर्मचाऱ्यांचे पदोन्नतीचे प्रकरण त्यांच्याविरुध्द शिस्तभंगविषयक /न्यायालयीन कार्यवाही सुरु असल्यामुळे विभागीय पदोन्नती समितीच्या पहिल्या बैठकीत मोहोरबंद पाकीटात ठेवले आहे अशा प्रकरणात, संबंधीत अधिकारी/कर्मचारी कालांतराने पूर्णत: निर्दोष सुटला व त्याला मोहोरबंद पाकिटात ठेवलेल्या निष्कर्षानुसार पदोन्नती देताना, नंतरच्या कालावधीत दुसरी विभागीय चौकशी किंवा न्यायालयीन कार्यवाही, त्याच्या कनिष्ठास पदोन्नती दिल्याच्या दिनांकानंतर सुरू झाली असेल, तर अशा प्रकरणी संबंधित अधिकारी/कर्मचाऱ्यास पहिल्या विभागीय पदोन्नती समितीच्या निष्कर्षानुसार त्याला पदोन्नती देण्यात यावी व त्याला कनिष्ठ असलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यास देण्यात आलेला पदोन्नतीचा दिनांक हा मानीव दिनांक म्हणून देण्यात यावा [कनिष्ठाच्या पदोन्नतीच्या दिनांकास अशा अधिकाऱ्याविरूध्द कोणतीही विभागीय चौकशी अथवा न्यायालयीन कार्यवाही सुरू नसल्यामुळे अशा कर्मचाऱ्याला प्रत्यक्ष पदोन्नती नाकारता येणार नाही ( Even if the second departmental proceeding or judicial proceeding relates to his misconduct during the period for which his assessment for promotion was done by the first DPC)]. परंतु ज्या प्रकरणी अशा कर्मचाऱ्याच्या कनिष्ठ कर्मचाऱ्यास पदोन्नती देण्यात आली नसेल तत्पूर्वी किंवा संबंधित कनिष्ठ कर्मचाऱ्यास पदोन्नती दिल्याच्या दिनांकापूर्वी, अशा अधिकाऱ्याविरुध्द दुसरी विभागीय चौकशी किंवा न्यायालयीन कार्यवाही सुरू झाली असेल अशा प्रकरणी मात्र उपरोक्त परिच्छेद १ (१) मधील तरतुदी लागू होतील.

१९) हे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकाला शासन निर्णय दि.२.४.१९७६ नुसार विचारात घेतलेली ज्या अधिकारी/कर्मचाऱ्यांची प्रकरणे प्रलंबित आहेत त्यांच्याबाबतीत खालीलप्रमाणे कार्यवाही करावी.

अ) विभागीय चौकशी /न्यायालयीन प्रकरणांच्या अनुषंगाने एखाद्या अधिकारी/ कर्मचाऱ्यास दि.२.४.१९७६ च्या शासन निर्णयानुसार जाणीवपूर्वक निर्णय घेऊन पदोन्नती नाकारली असल्यास त्यांचे प्रकरण मोहरबंद पाकीटात ठेवल्याचे समजून या प्रस्तावातील परि.१ (१ ते ११) प्रमाणे कार्यवाही करावी.

ब) ज्या प्रकरणात दि.२.४.१९७६ च्या शासन निर्णयान्वये जाणीवपूर्वक निर्णय घेऊन तात्पुरती पदोन्नती दिली असल्यास त्यांच्या बाबतीत प्रकरणपरत्वे प्रस्तावातील परिच्छेद १(१३) किंवा १(१५) किंवा १(१७) प्रमाणे कार्यवाही करावी.

क) ज्या प्रकरणात दि.२.४.१९७६ च्या शासन निर्णयानुसार जाणीवपूर्वक निर्णय घेऊन तदर्थ पदोन्नती दिली नसेल आणि तदर्थ पदोन्नती न देताच त्यांच्यावरील शिस्तभंगविषयक कारवाईच्या अनुषंगाने तो दोषी ठरत असल्यास व त्यांच्यावर शिक्षा/शास्ती बजावल्यास त्यांच्याबाबतीत प्रकरणपरत्वे परिच्छेद १(१४) किंवा १(१६) किंवा १(१७) प्रमाणे कार्यवाही करावी.

*************